(१३)

५५

**प्रशासकीय मान्यता-**

कोल्हापूर जिल्हा न्यायालयाच्या ४ थ्या मजल्यावर कौटुंबिक न्यायालयाकरीता फेरबदल / दुरुस्ती करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**

विधी व न्याय विभाग,

शासन निर्णय क्र.सीसीबी- २२०९/५९०/प्र.क्र१०४/का.१३

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दि. २५ जून,२०१०.

**पहा :-** प्रबंधक, (निरीक्षण-२), उच्च न्यायालय (अ.शा.),मुंबई यांचे पत्र क्र.बी(डब्ल्यू )/६८०४/१९९२, दि.१३ जुलै, २००९.

**शासन निर्णय** :- जिल्हा व सत्र न्यायालय,कोल्हापूरसाठी बांधण्यात आलेल्या नवीन न्यायालय इमारतीच्या ४ थ्या मजल्यावर कौटुंबिक न्यायालयासाठी जागा उपलब्ध करण्यासाठी आवश्यक असणारे फेरबदल / दुरुस्ती करण्याच्या रु.१२,३४,९६२/- ( रुपये बारा लक्ष चौतीस हजार नऊशे बासष्ट फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार) याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| १ | ४ थ्या मजल्यावरील फेरफार व दुरुस्ती | ९,६४,०६१ |
| २ | आकस्मिक खर्च(४%) | ३८,५६२ |
| ३ | विद्युतीकरण (८%) | ७७,१२५ |
| ४ | पाणी पुरवठा व मलनिस्सारण (१०%) | ९६,४०६ |
| ५ | किंमतीतील वाढ (५ %) | ५८,८०८ |
| | एकूण | १२,३४,९६२ |

२. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-०५१ बांधकाम-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-प्रमुख बांधकामे-०३ न्यायदान" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

३. हे आदेश, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:- २९२/इमा-२, दि. २३.११.२००९ अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग शासन निर्णय क्र. क्रमांक:-विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११ जुलै २००१ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( र. ग. पांचाळ )
कार्यासन अधिकारी.

प्रति,

महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,

प्रबंधक (निरीक्षण-२), उच्च न्यायालय (अपिल शाखा) , मुंबई,

जिल्हा व सत्र न्यायाधीश,कोल्हापूर,

E:\Desk.13\Kolhapur*118KOLA.lwp

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) - एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) , महाराष्ट्र-दोन, नागपूर,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर,
( मूळ अंदाजपत्रक व आराखडे यासह)
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग,कोल्हापूर,
जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर,
वित्त विभाग/व्यय-६,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई- ४०० ०३२,
महासंचालक , माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
कक्ष अधिकारी, का. ९,११ व १२,विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
निवडनस्ती.